**प्रशासकीय मान्यता :-**

करोना व्हायरसच्या प्रतिबंधात्मक उपाययोजनेसाठी जिल्हा नियोजन समितीकडून पाच व्हेंटीलेटर खरेदीस प्रशासकीय मान्यता.

श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : सीएचएस-२०२०/प्र.क्र.१३२/प्रशा-१**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१,

दिनांक : २४ मार्च, २०२०

**वाचा :**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८

४) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/ श्रीछशिमसरु सोलापूर/जिवायो/यंसाख/२०१९-२०/३-म/३१६९/२०२०, दिनांक १९.०३.२०२०

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/२०/कोषा.प्रशा.५, दिनांक ३० जानेवारी, २०२०

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग , क्रमांक : संकीर्ण २०२०/प्र.क्र. ५९ /२०/कोषा प्रशा-५, दिनांक १८.०३.२०२०

**<u>शासन निर्णय</u> :-**

करोना व्हायरस प्रतिबंधक उपाय योजनेसाठी श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर या संस्थेस जिल्हा वार्षिक योजनांतर्गत मंजूर होणा-या अनुदानातून पुढील तक्त्यात नमूद रुपये ६२,५०,०००/- (रुपये बासष्ठ लक्ष पन्नास हजार फक्त) ची यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नाव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | ॲडल्ट व्हेन्टीलेटर | ०५ | १२,५०,००० | ६२,५०,००० |
| | | | एकूण | ६२,५०,०००/- |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता संबंधीत संस्थेस जिल्हा वार्षिक योजनेतून प्राप्त निधीतून प्रदान करण्यात येत आहे.
२. सदर खरेदी ही करोना प्रतिबंधक उपाय योजनेसाठी आहे, ही बाब संबंधित संस्थाप्रमुख व संचालनालयाने तपासलेली आहे.
३. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता तसेच बांधकाम विद्युतीकरणाची नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केली आहे.
४. सदर यंत्र सामुग्री संबंधित केंद्र योजनेतंर्गत अनुज्ञेय आहे, याची खातरजमा संबधित संस्थेने केली आहे.
५. सदर विषयी " शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका " याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.
६. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया " औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत " निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.
७. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक ( वै.शि. ) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.
८. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.
९. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.
१०.मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.
११.सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.
१२.उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ " किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा " या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन

करावे. त्यानुषंगाने यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी येणारा खर्च संस्थेस खालील लेखाशिर्षाखालील मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा :-

मागणी क्रमांक - ओ-३३
प्रधान शिर्ष- ४५१५
यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी
४५१५ ०६०२
३१ सहा अनुदाने

३. सदर शासन निर्णय, उपरोक्त शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १८.०३.२०२० अन्वये निर्गमित निर्देश तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३२६१०५५५७१११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.03.31 10:22:59 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार -१ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालय, सोलापूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
६. निवडनस्ती (प्रशा-१)